**केंद्र शासन पुरस्कृत आरोग्य सेवेच्या विविध योजना / कार्यक्रमांवर नोडल ऑफीसर नेमण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
शासन निर्णय क्रमांकः पदस्था-१३१४/प्र.क्र ४५३ /सेवा-२
गो.ते.रुग्णालय, इमारत संकुल,१०वा मजला
मंत्रालय,मुंबई
दिनांक : ३ नोव्हेंबर,२०१४

## वाचा -

1) **सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र. पदस्था-१३१४/प्र.क्र ४५३ /सेवा-२ , दि.२०.९.२०१४**
2) **सार्वजनिक आरोग्य विभाग शासन शुद्धीपत्रक निर्णय क्र. पदस्था-१३१४/प्र.क्र ४५३/सेवा-२ दि.२७.१०.२०१४**
3) **सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.पदस्था-१३१४/प्र.क्र ४५३ /सेवा-२, दि.२८.१०.२०१४**

## शासन निर्णय -

संदर्भाधीन शासन निर्णयांन्वये केंद्र शासनाच्या विविध योजना/ कार्यक्रमांबाबत समन्वय साधण्यासाठी विविध अधिका-यांच्या नोडल ऑफीसर म्हणून नियुक्त्या करण्यात आलेल्या आहेत. सदर आदेशान्वये डॉ.डी.टी.कानगुले, सहायक संचालक, आरोग्य सेवा (कु.क),पुणे यांची प्रसुतीपूर्व गर्भलिंग निदान व लिंग निवड चाचणी प्रतिबंध कायदा या कार्यक्रमासाठी सहायक नोडल ऑफीसर म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

२. डॉ.डी.टी.कानगुले यांनी त्यांच्या मूळ पदाची कर्तव्य व जबाबदाऱ्या सांभाळून पुढील नमूद जबाबदाऱ्या पार पाडाव्यात.

- नोडल ऑफीसर या पदावर नियुक्त केलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना देण्यात आलेल्या योजना / कार्यक्रमाबाबत केंद्र / राज्यस्तरावर आयोजित करण्यात आलेल्या बैठकीस उपस्थित रहावे.
- अधिकाऱ्यांनी त्यांच्या संबंधीत योजना /कार्यक्रमासंदर्भात केंद्र शासन व राज्य शासनाच्या आरोग्य सेवेमध्ये समन्वय साधणे.
- संबंधीत योजना / कार्यक्रमांबाबत केंद्र स्तरावर होणाऱ्या बैठका / कार्यशाळा इत्यादी प्रसंगी राज्य शासनाचे प्रतिनिधीत्व करणे.
- केंद्र शासनामार्फत संबंधीत योजना / कार्यक्रमांबाबत वेळोवेळी घेतल्या जाणाऱ्या निर्णयांस अनुसरुन कार्यवाही करणे.
- योजनाबाबत वृत्तपत्र / वाहिन्यांमध्ये येणाऱ्या बातम्यांची चौकशी करुन कार्यवाही करणे तसेच संबंधीत वृत्तसंस्थेस खुलासा करणे.
- मुंबई जिल्हयातील तसेच मुंबई मंडळ,ठाणे / पुणे मंडळ,पुणे / नाशिक मंडळ, नाशिक या मंडळाच्या अधिपत्याखालील नोडल ऑफिसरांनी प्रत्येक महिन्याच्या तिसऱ्या मंगळवारी होणाऱ्या आरोग्य सेवाच्या

आढावा बैठकीसाठी उपस्थित रहावे तसेच उर्वरित मंडळाच्या अधिपत्याखालील अधिकाऱ्यांनी सदर बैठकीस व्हिडीओ कॉन्फरन्स् ( V.C. ) द्वारे संपर्क साधावा.

३. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०३०१२१७०७६३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO

Digitally signed by GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO
DN: CN = GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC HEALTH,CID - 918117
Date: 2014.11.03 13:08:01 +05'30'

( वि.पुं.घोडके )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त (कुटुंब कल्याण) तथा संचालक राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, मुंबई
२) संचालक आरोग्य सेवा, मुंबई
३) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , मुंबई
४) उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व परिमंडळ)
५) संबंधीत सर्व नोडल ऑफीसर
६) जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)
७) जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
८) मुख्य प्रशासकीय अधिकारी (सर्व)
९) सर्व उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी , सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई
१०) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, यांचे स्वीय सहाय्यक
११) निवडनस्ती (सेवा-२)